**श्री. सुशिल संजय बोंबले, पोलीस शिपाई, पोलीस आयुक्त,नाशिक शहर कार्यालय, यांच्याकरीता पोलीस शिपाई संवर्गात एक अधिसंख्य पद निर्माण करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक संकीर्ण-११२३/१९०१/प्र.क्र.१०९२/पोल-५ब,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
दिनांक -२१ मार्च,२०२४.

**वाचा :-** १) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचा दिनांक ३०.११.२०२३ रोजीचा प्रस्ताव.
२) दिव्यांग व्यक्ती हक्क अधिनियम २०१६ मधील कलम २०(४).
३) वैद्यकीय अधिकारी, पोलीस रुग्णालय, नाशिक शहर यांचे दि.२९.११.२०२२ रोजीचे प्रमाणपत्र.
४) वैद्यकीय प्राधिकारी, नाशिक ,महाराष्ट्र यांचे दि.११.०१.२०२३ रोजीचे प्रमाणपत्र.
५) उच्चस्तरीय सचिव समितीची चक्रीय पध्दतीने घेण्यात आलेली मान्यता.

**प्रस्तावना :**

श्री.सुशिल संजय बोंबले, पोलीस शिपाई /६४२, कार्यरत भद्रकाली पोलीस ठाणे, नाशिक शहर हे दिनांक ०१.०९.२०१२ पासून शासकीय सेवेत कार्यरत आहेत. श्री.बोंबले हे पोलीस शिपाई पदावर एस-७ (२१७००-६९१००) या वेतनश्रेणीत वेतन घेत आहेत. श्री.बोंबले हे त्यांच्या राहत्या घरी दि.०६.०९.२०२० रोजी जिन्यावरुन चक्कर येऊन पडल्याने, त्यांच्या डोक्याला गंभीर दुखापत झाल्यामुळे अद्याप कोमात आहेत.ते सध्या घरी बाह्यरुग्ण म्हणुन उपचार घेत असुन अद्याप कर्तव्य बजावण्यास सक्षम नाहीत. वैद्यकीय प्राधिकारी,नाशिक महाराष्ट्र यांच्याकडून श्री.बोंबले यांना ६० टक्के अपंगत्वाचे प्रमाणपत्र देण्यात आले आहे. अपंग कायदा १९९५ च्या कलम ४७ नुसार श्री.बोंबले यांचेसाठी अधिसंख्य पद निर्माण करण्यासंदर्भातील प्रस्ताव शासनास सादर करण्यात आला आहे.

दिव्यांग व्यक्ती हक्क अधिनियम २०१६ मधील कलम २०(४) अन्वये सेवेत कार्यरत असताना दिव्यांगत्व आल्यास कर्मचा-यास त्याच्या दिव्यांगत्वानुरुप सुयोग्य पदावर पदस्थापना दिली जाईल व मूळ धारण करत असलेल्या पदाचे वेतन संरक्षण दिले जाईल. सदर पद उपलब्ध नसल्यास कर्मचा-यास दुसरे सुयोग्य पद उपलब्ध होईपर्यंत किंवा त्याच्या नियत वयोमानानुसार सेवानिवृत्तीच्या दिनांकापर्यंत यापैकी जे आधी घडेल तोपर्यंत अधिसंख्य पदनिर्माण करुन त्यावर पदस्थापना दिली जाईल, अशी तरतूद करण्यात आली आहे. सदर तरतूद विचारात घेऊन श्री.सुशिल संजय बोंबले, पोलीस शिपाई यांच्याकरीता सेवासंरक्षणासहीत सर्व लाभ देण्याकरीता पोलीस शिपाई या संवर्गातील एक अधिसंख्य पद दिनांक ०६.०९.२०२० पासून त्यांना दुसरे सुयोग्य पद उपलब्ध होईपर्यंत किंवा त्यांच्या नियत वयोमानानुसार सेवानिवृत्तीच्या दिनांकापर्यंत यापैकी जे अगोदर घडेल त्या कालावधीसाठी निर्माण करण्यास उच्चस्तरीय सचिव समितीने चक्रीय पध्दतीने मान्यता दिली आहे.

**शासन निर्णय :-**

श्री.सुशिल संजय बोंबले, पोलीस शिपाई,पोलीस आयुक्त नाशिक शहर यांची आस्थापना यांचे एस-७( २१७००- ६९१०० )या वेतनश्रेणीतील वेतन काढण्यासाठी पोलीस शिपाई संवर्गातील एक अधिसंख्य पद दिनांक ०६.०९.२०२० पासून निर्माण करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर अधिसंख्य पद पोलीस आयुक्त नाशिक शहर यांच्या आस्थापनेवर निर्माण करण्यात येत आहे.

३. सदर पद दिव्यांग व्यक्ती हक्क अधिनियम २०१६ मधील कलम २०(४) मधील तरतूदीनुसार, श्री.सुशिल संजय बोंबले, पोलीस शिपाई यांना सेवा संरक्षणासहित सर्व लाभ देण्याकरिता, दिनांक ०६.०९.२०२० पासून श्री.बोंबले यांना दुसरे सुयोग्य पद उपलब्ध होईपर्यंत किंवा त्याच्या नियत वयोमानानुसार सेवानिवृत्तीच्या दिनांकापर्यंत यापैकी जे आधी घडेल तोपर्यंत निर्माण करण्यात येत आहे. त्यानंतर सदर पद आपोआप संपुष्टात येईल.

४. सदर पदाच्या वेतन व भत्त्यावरील खर्च हा " मागणी क्रमांक-बी-१, उपमुख्यलेखाशिर्ष-१०९, जिल्हा पोलीस दल(००)(०१) जिल्हा पोलीस बल (अनिवार्य) संगणक संकेतांक क्रमांक २०५५०१६८-०१ (वेतन)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ६२/आपुक,दिनांक ०७.०३.२०२४ अनुसार, उच्च स्तरीय सचिव समितीच्या चक्रीय पध्दतीने घेतलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२४०३२११५३२००५३२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

YOGITA SHRIDHAR MALAP

Digitally signed by YOGITA SHRIDHAR MALAP
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=b7742e8c5c015004bf8a11faf904d3994f1e6c348083fb8212c050bb37fc1382, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C574CC6DF7C7AE23D7188E1018C0E41F16D862FFE8E2E4B4A4B08923E9BDF7A7, cn=YOGITA SHRIDHAR MALAP
Date: 2024.03.21 15:44:27 +05'30'

**( योगिता मालप )**
**कक्ष अधिकारी,महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१.पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२.पोलीस आयुक्त, नाशिक शहर
३.महालेखापाल,(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य मुंबई/ नागपूर.
४.महालेखापाल ( लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य,मुंबई/नागपूर.
५.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
७.वित्त विभाग, आ.पु.क. कक्ष मंत्रालय,मुंबई.
८.निवडनस्ती, पोल ५-ब, गृह विभाग, मंत्रालय मुंबई-३२..